**आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त शासकीय आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांसाठी रुग्णवाहिका व आयुष डॉक्टरांची सुविधा पुरविण्याच्या प्रकल्पाच्या मार्गदर्शक तत्वांना मंजूरी देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः केंद्रीय-२०१८/प्र.क्र.८/का-१९**
मंत्रालय, मुंबई ४०००३२
तारीख: २५/०७/२०१८

वाचा-

**१) जनजाती कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.F.No.११०१५/०५/२०१७-TSP, दि.३०/०५/२०१७**

**२) आदिवासी विकास विभाग,शासन निर्णय क्र.केंद्रिय-२०१६ /प्र.क्र.६४/ का. १ ९ , दि.२१/०३/२०१७**

प्रस्तावना -

महाराष्ट्र राज्याचा आदिवासी लोकसंख्येच्या बाबत देशात दुसरा क्रमांक असून राज्याच्या एकूण लोकसंख्येमध्ये अनुसुचित जमातीचे प्रमाण ९.४ टक्के इतके आहे. ह्या आदिवासी जनतेचा विकास करणे ही महाराष्ट्र शासनासाठी उच्च प्राथमिकता आहे. आदिवासी मुला-मुलींच्या आशा आकांक्षा पूर्ण करण्यासाठी, आदिवासी विकास विभाग गेल्या काही दशकांपासून शासकीय आश्रमशाळा चालवित आहे.राज्याच्या सर्व आदिवासी भागांमध्ये ह्या आश्रमशाळा आहेत. दुर्गम भागात राहणा-या आदिवासी मुला-मुलींच्या शिक्षणाची या आश्रमशाळांमुळे मोठी सोय झाली आहे.आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक व आरोग्य समस्या सोडविण्यासाठी आदिवासी विकास विभाग कटिबद्ध आहे. आश्रमशाळेतील सोयीसुविधा वाढविण्यासाठी आदिवासी विकास विभागामार्फत कायापालट, WASH ही अभियाने सुरू करण्यात आलेली आहेत. तसेच विभागाच्या नाविन्यपूर्ण उपाययोजनांमुळे ब-याच आश्रमशाळांना ISO प्रमाणपत्रेही प्राप्त झालेली आहेत.

२. राष्ट्रीय बालस्वास्थ्य कार्यक्रमांतर्गत (आरबीएसके) आरोग्य विभागाकडून विद्यार्थ्यांची आरोग्य तपासणी कार्यक्रम राबविला जातो. मात्र प्रतिकूल भौगोलिक परिस्थिती,आदिवासी भागातील रिक्त पदे व दुर्गम भागातील आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांसाठी सदर कार्यक्रम पुरेसा होत नाही.

३. सार्वजनिक आरोग्य विभागामार्फ़त मे.भारत विकास ग्रुप ऑफ इंडिया (बी.व्ही.जी इंडिया) मार्फत संपूर्ण राज्यात अतिसुसज्ज रूग्णवाहिकांची आपात्कालीन वैद्यकीय प्रतिसाद सेवा-"१०८" (Emergency Medical Service-EMS) राबविली जाते.मे.बी.व्ही.जी इंडिया मार्फत राज्यात पुरविण्यात येणारी सेवा ही तालुका पातळीवरील असल्याने आदिवासी विभागांतर्गत अतिदुर्गम भागात असलेल्या निवासी आश्रमशाळेतील सुमारे एक लाख पेक्षा जास्त विद्यार्थी या सेवेच्या लाभापासुन वंचित राहतात. या बाबी विचारात घेवुन राज्यातील ३०१ शासकीय निवासी आश्रमशाळा व ८ एकलव्य निवासी आश्रमशाळेमधील सुमारे एक लाख पेक्षा जास्त विद्यार्थ्यांसाठी २४ X ७ तास आरोग्यसेवा उपलब्ध करुन देणे आवश्यक आहे. .

४. महाराष्ट्र शासनाने २०१६ मध्ये स्थापन केलेल्या डॉ.सुभाष साळुंखे समितीच्या अहवालामध्ये आश्रमशाळांसाठी Mobile Medical Unit ची आवश्यकता असल्याचे नमूद केलेले आहे. या सर्व निष्कर्षांमुळे एक अतिरिक्त विशेष आरोग्यसेवा व्यवस्था निर्माण करणे आवश्यक आहे जी सध्याच्या आरोग्य व्यवस्थेशी पूरक असेल .या अतिरिक्त आरोग्य व्यवस्थेचे स्वरूप असे असेल की ती लहान आजारांच्या उपचारांपासून व्यापक आरोग्य विमा सेवेत असणा-या गंभीर विकारांचे निराकरण होईपर्यंत विद्यार्थ्यांना व्यापक आरोग्य सुविधा पुरवेल. .

५. Providing Basic Ambulance with AYUSH doctor & ANM या योजनेसाठी विशेष केंद्रीय सहाय्य योजने अंतर्गत सन २०१६-१७ करीता रु.५००.०० लक्ष निधी मंजूर झालेला आहे. सन २०१७-१८ करीता भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत comprehensive health camp with health cards @ Rs. ५०० / student साठी रु.३७५.०० लक्ष निधी मंजूर झालेला आहे. तसेच Providing Basic Ambulance with AYUSH doctor & ANM या योजनेसाठी विशेष केंद्रीय सहाय्य योजने अंतर्गत सन २०१८-१९ व सन २०१९-२० करीता रू.२८२०.१२ लक्ष निधी मंजुर झालेला आहे. सन २०१६-१७ व सन २०१७-१८ मध्ये प्राप्त झालेला निधी संदर्भाधिन शासन निर्णयान्वये आयुक्त, आदिवासी विकास ,नाशिक यांना वितरित करण्यात आलेला आहे. सबब, उपरोक्त मंजूर रू.३६९५.१२ लक्ष निधी व राज्यनिधीतून रू.१६५२.५१ लक्ष निधी अशाप्रकारे एकुण रु.५३४७.६३ लक्ष निधी सदर प्रकल्पाकरीता उपलब्ध करून देण्यात येईल.

६. सबब, केंद्र शासनाच्या विशेष केंद्रिय सहाय्य अंतर्गत मंजूर अनुदानातून व राज्य योजना निधीतून आदिवासी विकास विभागाच्या अपर आयुक्त,आदिवासी विकास ,नाशिक ,अमरावती,नागपूर यांच्या अधिनस्त शासकीय आश्रमशाळा, एकलव्य निवासी आश्रमशाळा व इंग्रजी माध्यमाच्या शाळेमधील विद्यार्थ्यांसाठी रुग्णवाहिका व डॉक्टरांची सुविधा राबवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

**शासन निर्णय-**

राज्यात अतिसुसज्ज रूग्णवाहिकांची आपात्कालीन वैद्यकीय प्रतिसाद सेवा (Emergency Medical Service-EMS) मे.भारत विकास ग्रुप ऑफ इंडिया (बी.व्ही.जी इंडिया) या कंपनीमार्फत संपूर्ण राज्यात सार्वजनिक आरोग्य विभागाच्या शासन निर्णय दि.१८.०३.२०१३ अन्वये राबविण्यात येत आहे. मे.बी.व्ही.जी इंडिया या कंपनीला वैद्यकीय प्रतिसाद सेवेमध्ये असलेला अनुभव विचारात घेता, सार्वजनिक आरोग्य विभागाच्या धर्तीवर आदिवासी विकास विभागाच्या अधिनस्त शासकीय आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांसाठी रुग्णवाहिका व डॉक्टरांची सुविधा मे.भारत विकास ग्रुप ऑफ इंडिया लि. (बी.व्ही.जी) या सेवापुरविठादारामार्फत पुरविण्याच्या एकुण रु.५३४७.७३ लक्ष किंमतीच्या प्रकल्पास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे. सदर प्रकल्प अंमलबजावणीच्या मार्गदर्शक सूचना परिशिष्ट-१ प्रमाणे राहतील.

२. सदर मार्गदर्शक सूचनांनुसार वितरीत तरतूदींच्या मर्यादेत योजना राबविण्याबाबत त्वरीत कार्यवाही करण्यात यावी व त्याचे उपयोगिता प्रमाणपत्र आर्थिक व भौतिक अहवालासह शासनास सादर करण्याची दक्षता घ्यावी.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०७२६१२४२११३१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Ajitsingh R Rajput

Digitally signed by Ajitsingh R Rajput
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=TDD Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a614ce75be611413980d3efebe7cde81ad571ab119e8360b7b526b5159edd099, serialNumber=32168d31c7d800af039db3657f6a01d233033f3f7c16b7ca135b2c868025eb3e, cn=Ajitsingh R Rajput
Date: 2018.07.26 12:43:38 +05'30'

(अ.रा.राजपूत)
कार्यासन अधिकारी

**प्रत,**

१. मा.मंत्री आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई
२. मा.राज्यमंत्री आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव,आदिवासी विकास विभाग ,मंत्रालय,मुंबई
४. प्रधान सचिव,सार्वजनिक आरोग्य विभाग, ,मंत्रालय,मुंबई
५. आयुक्त,आदिवासी विकास,महाराष्ट्र राज्य,नाशिक.
६. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
७. सर्व सहसचिव/उपसचिव ,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
८. सर्व अपर आयुक्त ,आदिवासी विकास
९. मुख्य कार्यकारी अधिकारी, महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना
१०. संचालक, आरोग्य सेवा संचलनालय
११. सर्व अवर सचिव/ कक्ष अधिकारी ,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई.
१२. व्यवस्थापकीय संचालक,भारत विकास ग्रुप लि.
१० संगणक समन्वयक,आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई
११. निवड नस्ती (का.१९) आदिवासी विकास विभाग,मंत्रालय,मुंबई

## परिशिष्ट क्र.-१

<table>
<tr><td>१</td><td>प्रकल्पाचे नांव</td><td>Providing Basic Life Support Ambulance with AYUSH doctor & Auxilary Nurse Midwife (ANM) at Govt. Ashram schools, Eklavya Model Residential Schools</td></tr>
<tr><td>२</td><td>प्रकल्पाचे प्रस्तावित लाभ क्षेत्र</td><td>प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, कळवण,तळोदा, धुळे, यावल, नंदुरबार,राजुर,किनवट,पांढरकवडा,धारणी,कळमनुरी,नागपूर,गडचिरोली,अहेरी,भामरागड यांच्या अधिनस्त ३०१ शासकीय आश्रमशाळा, ८ एकलव्य निवासी आश्रमशाळा.</td></tr>
<tr><td>३</td><td>वित्तीय तरतूद</td><td>(1Providing Basic Ambulance with AYUSH doctor & ANM या योजनेसाठी विशेष केंद्रीय सहाय्य योजने अंतर्गत सन २०१६१-७ करीता रु५००.००. लक्ष इतका मंजूर निधी .<br>२) सन २०१७-१८ करीता भारतीय संविधानाच्या अनुच्छेद २७५(१) अंतर्गत comprehensive health camp with health cards @ Rs. ५०० / student साठी रु.३७५.०० लक्ष इतका मंजूर निधी.<br>३) Providing Basic Ambulance with AYUSH doctor & ANM या योजनेसाठी विशेष केंद्रीय सहाय्य योजने अंतर्गत सन २०१८-१९ व सन २०१९-२० करीता रू.२८२०.१२ लक्ष इतका मंजूर निधी.<br>४) राज्यनिधीतून रू१६५.२.५१ लक्ष निधी अशाप्रकारे एकुण रु५३४.७.६३ इतका मंजूर निधी.</td></tr>
<tr><td>४</td><td>प्रकल्पाचा खर्च</td><td>एकूण बीएलएस रुग्णवाहिका ४८<br>अ. भाडे (Rent) -<br>रुग्णवाहिकेचे भाडे हे सदर रूग्णवाहिका खरेदी करण्यासाठी घेतलेल्या कर्जावर ५ वर्षासाठी आकारण्यात येणारा मासिक हफ्ता ( बँकेचा ११% व्याज दर धरून) इतके असेल :-<br>प्रति रूग्णवाहिका घेतलेले कर्ज- रू.२३.३० लक्ष<br>प्रति रूग्णवाहिका मासिक हफ्ता-रू.५१,९००/-
<table>
<tr><th>अ. क्र.</th><th>तपशील</th><th>एक रुग्णवाहिकेचे प्रति महीना भाडे</th><th>एकूण रुग्णवाहिका</th><th>एकूण रुग्णवाहिकांचे प्रति वर्ष भाडे</th><th>एकूण रुग्णवाहिकांचे तीन वर्षांचे भाडे</th></tr>
<tr><td>१.</td><td>रुग्णवाहिका भाडेकिंमत</td><td>५१,९००-/</td><td>४८</td><td>२,९८,९४,४०० /-</td><td>८,९६,८३,२०० /-</td></tr>
</table>
</td></tr>
</table>

**ब. कामकाज आवर्ती खर्च (Operational cost) - ४८ रुग्णवाहिका**

| क्र | वर्ष | दरमहा / रुग्णवाहिका किंमत रुपयांमध्ये | एकुण रुग्णवाहिका | एकूण रुग्णवाहिकांचे प्रति वर्ष खर्च |
|---|---|---|---|---|
| १. | १९-२०१८ | २,३५,१६६ /- | ४८ | १३,५४,५५,६१६/- |
| २. | २०-२०१९ | २,५३,९७९-/ | ४८ | १४,६२,९१,९०४/- |
| ३. | २१-२०२० | २,७४,२९७-/ | ४८ | १५,७९,९५,०७२/- |

* एका रूग्णवाहिकेचा प्रतिमहा कामकाज आवर्ती खर्चाची रू.२,३५,१६६ /- इतकी किंमत ही सार्वजनिक आरोग्य विभाग , शासन निर्णय, दिनांक २२ ऑक्टोबर २०१४. अन्वये २०१८-१९ साठी मान्यता दिलेल्या दरानुसार अंतर्भूत करण्यात आली आहे .

सन २०१९-२० व सन २०२०-२१ साठी सदर दरात प्रती वर्ष ८% वाढ करण्यात येईल.

**क.सिकरूम साठी अंदाजपत्रक -**

| अ .क्र. | तपशील | किंमत रुपयांमधे |
|---|---|---|
| १. | उपकरणांसाठीचा खर्च | ४०,५७२/- |
| २. | औषधे व दैनंदिन वापरासाठी वस्तू (उपभोग वस्तू) | ४९,३५०/- |
| ३. | प्रति सिकरूम एकूण खर्च | ८९,९२२/- |
| ४. | ५३ सिकरूमचा एकूण खर्च | ४७,६५,८६६/- |
| ५. | वस्तु व सेवा कर-GST१२) %) | ५,७१,९०४/- |
| | **एकूण खर्च** | **५३,३७,७७०/-** |

**एकूण खर्च अंदाजपत्रक (अ+ब+क)**

| क्र | तपशील | ४८ रुग्णवाहिका- प्रति वर्ष खर्च | ४८ रुग्णवाहिका- ३ वर्षां साठी खर्च |
|---|---|---|---|
| १. | रुग्णवाहिका भाडे किंमत (१२ महिने) | २,९८,९४,४०० /- | ८,९६,८३,२००/- |
| २. | कामकाजाचा खर्च | २०१८-१९ - १३,५४,५५,६१६/-<br>२०१९-२०- १४,६२,९१,९०४/-<br>२०२०-२१- १५,७९,९५,०७२/- | ४३,९७,४२,५९२/- |
| ३. | सिकरूम खर्च | - | ५३,३७,७७०/- |
| ४. | **एकूण** | १७, ६४, ७५, २६४/- | ५३,४७,६३,५६२/- |

| | | |
|---|---|---|
| ५ | प्रकल्प राबविणारी यंत्रणा | भारत विकास ग्रुप इंडिया लि. |
| ६ | नियंत्रक अधिकारी | आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक |
| ७ | प्रकल्पाचा उद्देश | १. आदिवासी आश्रम शाळेतील विद्यार्थ्यांमधील मृत्यूचे प्रमाण कमी करणे.<br>२. विद्यार्थ्या मधील विविध आजारांचे प्रमाण कमी करणेसाठी विद्यार्थी व शिक्षक कर्मचारी यांच्यामध्ये आरोग्यदायी सवयी अंगीकारणे.<br>३. आश्रम शाळेतील (सिकरूम) दवाखान्यांमधून व भेटीद्वारे विद्यार्थ्यांची नियमित आरोग्य तपासणी करणे<br>४. गरजू आजारी विद्यार्थ्यांसाठी विशेष तज्ञ डॉक्टरांच्या वैद्यकीय सेवा उपलब्ध करून देणे<br>५. आपत्कालीन परिस्थितीमध्ये संलग्न विभागातील आश्रम शाळांमध्ये त्वरित उपचार आणि संदर्भीय सेवा उपलब्ध करून देणे<br>६. प्रत्येक विद्यार्थ्यांचे आरोग्य विषयक सर्व नोंदी असणारी संगणकीय आरोग्य पत्रिका (Digital Health Card) जतन करणे<br>७. सर्व प्रकारच्या आजाराबाबत माहिती दर्शवणारा फलक (Dashboard) निर्माण करणे<br>८. विद्यार्थी व कर्मचारी यांचेसाठी आरोग्यदायी जीवनशैली अंगिकारण्यासाठी विविध आरोग्य विषयी व्याख्याने आयोजित करणे |
| ८ | **प्रकल्प अंमलबजावणी ची कार्यपद्धती** | **१."१०८" आपत्कालीन रुग्णवाहिका सेवा -.**<br>➢ डॉ. साळुंखे समितीच्या अहवालानुसार, जास्त प्रमाणात झालेल्या मृत्यूंमध्ये तात्काळ वैद्यकीय हस्तक्षेप आवश्यक होता .(१२.६२% - अचानक मृत्यू, ४.७९% - साप चावणे, ४.२९% - अपघाती मृत्यू, ५.०४% - बुडून मृत्यू इत्यादि) म्हणूनच, समितीने आपत्तकालीन रुग्णवाहिका सेवेची आश्रमशाळांसाठी शिफारस केली आहे.<br>➢ भारत विकास ग्रुप इंडिया लिमिटेड (बीवीजी इंडिया लिमिटेड) च्या सहकार्याने आश्रम शाळांकरिता आयुष चिकित्सकांसह बेसिक लाइफ सपोर्ट (बी.एल.एस.) एम्बुलेंस सेवा राबविण्यात येत आहे. सर्व शासकीय आश्रमशाळांना ४८ क्लस्टर मध्ये विभागण्यात आले असून एका क्लस्टरसाठी एक बीएलएस ॲम्ब्युलन्सची तरतूद आयुष चिकित्सक व वाहनचालकासह बी.वी.जी इंडिया लि. मार्फ़त करण्यात आलेली आहे.<br>➢ योजनेच्या अंमलबजावणीसाठी येणारा सर्व कामकाज आवर्ती खर्च (Operational cost) - हा बी.व्ही.जी इंडिया लि. मार्फ़त करण्यात येईल.-<br>➢ उदा. आयुष चिकित्सक,वाहनचालक यांची नियुक्ती व प्रशिक्षण , mobile Application व डॅशबोर्ड तयार करणे, रुग्णवाहिकेचा संपुर्ण खर्च इ. |

२. आपत्कालीन नियंत्रण कक्ष - (Control Room)

सार्वजनिक आरोग्य विभागामार्फत राबविण्यात येणा-या आपात्कालीन वैद्यकीय प्रतिसाद सेवा (ERMS) साठी चेस्ट हॉस्पिटल, औंध,पुणे येथे २४X७ तास सेवापुरवठा करण्यासाठी आपात्कालीन नियंत्रण कक्ष स्थापन करण्यात आलेला आहे.सदर नियंत्रण कक्षामध्ये आदिवासी विकास विभागाच्या या योजनेसाठी स्वतंत्र कक्ष खालील कामांसाठी निर्माण करण्यात येईल.

-(बी.एल.एस.) एम्बुलेंस सेवेचे नियंत्रण व व्यवस्थापन,मोबाईल अँप्लिकेशन व वेब पोर्टल मधील गुणवत्तावाढ करणे ,विद्यार्थ्यांच्या हेल्थ कार्डची डेटाबेसचे व्यवस्थापन व विश्लेषण, गंभीर आजार असलेल्या विद्यार्थ्यांची माहिती ठेवणे ,समन्वय साधणे व आदिवासी विकास विभागाशी सबंधीत इतर सर्व कामे.

**३. गंभीर विकार असलेल्या विद्यार्थ्यांचे व्यवस्थापन.**

गंभीर विकार असलेल्या रुग्णांचे कार्यक्षम व्यवस्थापन अत्यंत महत्वाचे आहे जेणेकरुन त्या विकाराची वाढ रोखता येईल. मुख्याध्यापक / वार्डन /प्रकल्प कार्यालयातील अधिकाऱ्यांची जबाबदारी निश्चित करण्यात येईल व रुग्णाच्या व्यवस्थापनात कोणतीही त्रुटी राहणार नाही याची दक्षता घेण्यात येईल.

**४.विद्यार्थ्यांचे नियमित वैद्यकीय तपासणी.**

नियमित वैद्यकीय तपासणीच्या अभावी गंभीर आजारामुळे होणाया- मृत्यूंचे प्रमाण मोठे आहे (२३.०८ %). नियमित वैद्यकीय तपासणी रोगांच्या वाढीवर नियंत्रण ठेवेल. बी.एल.एस. रुग्णवाहिकेसाठी बी.व्ही.जी मार्फ़त भरती केलेल्या आयुष डॉक्टरांना नियमित वैद्यकीय तपासणी करणे बंधनकारक राहील, ज्यामुळे बहुतांश सामान्य रोग आश्रमशाळेतच हाताळता येतील परंतु गंभीर आजार असल्यास आवश्यकतेनुसार उच्च आरोग्यसेवा केंद्रांमध्ये उपचारासाठी पाठविण्यात येईल.

**५.प्रत्येक विद्यार्थ्याच्या वैद्यकीय इतिहासाचे अनुरक्षण -**

- विद्यार्थ्यांची नियमित आरोग्य चाचणी या व्यवस्थेचा महत्वाचा भाग आहे. प्रत्येक विद्यार्थ्याचे डिजिटल हेल्थ कार्ड ऑनलाइन पोर्टलच्या माध्यमातून हेल्थ कार्डची सामग्री अद्ययावत करण्याच्या सुविधेसह ठेवले जाईल.
- जेव्हा अनिश्चित इंटरनेट कनेक्टिव्हिटी असेल किंवा इंटरनेट कनेक्टिव्हिटी नसेल तेव्हा इंटरनेट कनेक्टिव्हिटी पुर्नसंचयित झाल्यावर रांगेत असलेल्या सामग्री स्वयंचलितपणे अपलोड केल्या जातील. हे आरोग्य कार्ड प्रिंट करण्यायोग्य असेल जेणेकरून आवश्यक

असेल तेव्हा ते वापरता येईल.

- या प्रकल्पातर्गत बी.एल.एस. रुग्णवाहिकेतील आयुष डॉक्टर्स व नियुक्त केलेल्या ANM ह्यांना विद्यार्थ्यांचे हेल्थ कार्ड अपडेट करणे बंधनकारक राहील.

**६.विद्यार्थ्यांच्या आरोग्य स्थितीचे नियमित विश्लेषण-**

- विद्यार्थ्यांच्या आरोग्य स्थितीचे व शाळांच्या सभोवतालच्या परिसराच्या स्थितीचे विश्लेषण प्रकल्प कार्यालयनिहाय केले जाईल. सर्व प्रकल्प कार्यालयांकडे अद्ययावत डेटा असेल जेणेकरून वेळेतच आवश्यक हस्तक्षेप करता येईल.
- यामुळे संबंधित अधिका-यांना कोणत्याही रोगाचा उद्रेक होण्याआधी कार्यवाही करण्यास मदत होईल. हे अहवाल प्रकल्प कार्यालय, आयुक्तालय ,अपर आयुक्तालय,मंत्रालय स्तरावर एका ऑनलाइन डॅशबोर्ड द्वारे पाहिले जातील.
- **प्रस्तावित डॅशबोर्डवर खालील गोष्टी दाखविल्या जातील** .

* आयुष डॉक्टर्सने आश्रमशाळेतील विद्यार्थ्याची दररोज केलेली तपासणी माहिती.
* आयुष डॉक्टर्सने दररोज हाताळलेले आपत्कालीन रुग्णांची माहिती .
* विद्यार्थ्यांची आरोग्य विषयक स्थितीची माहिती .
* रूग्णवाहिकांमध्ये दररोज उपलब्ध डॉक्टर्स, कर्मचारी व औषधी यांची माहिती

वरील सर्व माहिती तक्ते (formats) स्वरूपात विकसित केले जातील .हे तक्ते भरून संबंधित प्रकल्प अधिकारी , अपर आयुक्त, आयुक्त ,आदिवासी विकास व आदिवासी विकास विभाग,मंत्रालय यांना सादर करतील.

**७.आरोग्य शिक्षण व शाळा आरोग्य समिती-**

- आजाराचे व मृत्यूचे प्रमाण कमी करणेसाठी आरोग्य शिक्षणाचा फार मोठा सहभाग आहे . विद्यार्थ्यांना चांगले आरोग्य वातावरण देण्याची सामूहिक जबाबदारी शाळा आरोग्य समिती ची आहे.
- प्रत्येक आश्रमशाळेत शाळा आरोग्य समिती स्थापन केली जाईल. ह्या समितीमध्ये मुख्याध्यापक, अधीक्षक, दोन नामांकित वर्ग शिक्षक, बी.व्ही.जी द्वारे नियुक्त केलेले डॉक्टर्स, ANM, शाळेतील विद्यार्थ्यांमधून नियुक्त केलेले आरोग्य व पोषण मंत्री आणि दोन पालक यांचे समावेश असेल.
- ह्या प्रकल्पाची शाळा पातळीवर उत्तम अंमलबजावणीसाठी ही समिती पूर्णपणे मदत करेल. तसेच आरोग्य विषयक नाविन्यपूर्ण उपक्रम उदा. क्विझ, निबंध, वक्तृत्व व हस्तकला स्पर्धा, प्रभात फेरी, परसबाग, अतिथी व्याख्याता इतरची अंमलबजवणी समिती करेल.

| | | |
|---|---|---|
| | | ➢ सार्वजनिक आरोग्य विभाग यांच्या मार्फत तयार करण्यात येणाऱ्या माहिती शिक्षण व सपंर्क (IEC) विभागाने तयार केलेल्या प्रसिद्धी साहित्याचा वापर करू शकतात तसेच सार्वजनिक आरोग्य विभागा मार्फत दर महा प्रसिद्ध करण्यात येणाऱ्य "आरोग्य पत्रिका " पुस्तिकेचा उपयोग विद्यार्थ्यांना आरोग्य शिक्षण देण्यासाठी खूपच उपयोगी होऊ शकतो.<br><br>**८.आजारी व्यक्तींच्या खोलीचे नूतनीकरण -**<br>वैद्यकीय कक्ष (Sick Room) ची पुनर्रचना करेल जेणेकरून कमीत कमी एका रुग्णाला intravenous drip infusion व अत्यावश्यक सेवा पुरविण्यात येईल .क्लस्टरच्या बेस लोकेशनमधील खोल्यांचे नूतनीकरण करण्यात येईल.<br><br>**९.स्थानिक स्तरावर आरोग्य जागरुकता कार्यक्रम.**<br>➢ २००१-१३ च्या दरम्यान, ३५.३६ % मृत्यू (२८१) विद्यार्थ्यांच्या घरात घडल्याची नोंद आहे. डॉ. साळुंखे समितीने असे निदर्शनास आणले आहे की पालक आपल्या मुलांना त्यांच्या पारंपरिक भगताकडे किंवा मांत्रिकाकडे घेऊन जातात ज्यामुळे उपचारांना विलंब होऊन मृत्यू ओढवतो. म्हणून बहुतांश मुले ज्या गावातील आहेत अशा काही गावांमध्ये ह्यासंदर्भात जागृती करणे आवश्यक आहे.<br>➢ ही जागृती योजनेचे स्वरूप संबंधीत ग़ावच्या ग्राम सभांमध्ये ठरवली जाऊ शकते ज्यामध्ये सरपंच, ग्रामसेवक, संबंधीत प्रकल्प कार्यालयातील अधिकारी , ऍम्ब्युलन्स मधील आयुष डॉक्टर , स्थानिक आरोग्य सेविका (ANM) व आशा वर्कर यांचा सक्रिय सहभाग असेल.<br>➢ आश्रम शाळांना उन्हाळयाच्या सुट्या असल्याने आयुष डॉक्टर हा निश्चित केलेल्या गावांमधे (वाडी/वस्ती/पाडा) तेथील सरपंच व ग्रामसेवक यांच्या मदतीने "मोफत आरोग्य तपासणी शिबीरांचे आयोजन करेल. तो/ती खालील विषया संदर्भात लोकांना आरोग्य शिक्षण देईल.<br>*वैयक्तीक व सार्वजनीक स्वच्छता , व्यसनमुक्ती ,स्तनपान , कुपोषण , पोषण आहार , सिकल सेल ऍनिमीया , अतिसार , जलजन्य आजार इ. तो/ती यासाठी स्थानिक आरोग्य सेविका (ANM) आणि आशा वर्कर यांची मदत घेईल.<br><br>**१०.आरोग्य व्यवस्थेचे संनियंत्रण**<br>➢ सदर योजनेचे मंत्रालय, आयुक्त कार्यालय आणि प्रकल्प कार्यालय अशा ३ स्तरांवर संनियंत्रण करण्यात येईल. आयुष डॉक्टर आणि शाळा मुख्याध्यापक यांच्यासह प्रकल्प अधिका-यांच्या अध्यक्षतेखाली प्रकल्प कार्यालय स्तरावर मासिक सभा आयोजित करण्यात येतील. ही समिती "तक्रार निवारण कक्ष " म्हणून कार्य करेल.<br>➢ या प्रकल्पाच्या कामकाजावर चर्चा करण्यासाठी अपर आयुक्त स्तरावरची त्रैमासिक बैठक आणि आयुक्त ,आदिवासी विकास ,नाशिक यांच्या पातळीवर सहामाही बैठक आयोजित |

केली जाईल. डॉ. साळुंके समितीने विद्यार्थ्यांच्या मृत्यू प्रकरणात सामाजिक वैद्यकीय आढाव्यासाठी एक प्रारूप तयार केला आहे व ते ऑनलाइन पोर्टलवर उपलब्ध असेल जेणेकरून ते प्रकल्प कार्यालय स्तरावर समितीकडे सहज उपलब्ध होईल. यामुळे संपूर्ण राज्यात मृत्यू अहवालात एकरूपता येईल.

**११. वैद्यकीय सेवेसाठी 'आयुष डॉक्टरांची भरती –**

आयुष डॉक्टरांची भरती गरजेनुसार / आवश्यकतेनुसार बी.व्ही.जी. इंडिया लि. करेल, 'आदिवासी विकास विभागाच्या' गरजेनुसार आयुष डॉक्टरांना आपत्कालीन वैद्यकीय सेवांचे प्रशिक्षण दिले जाईल. खालील प्रमाणे सानुकूलीत (कस्टमाइज) गरजा लक्षात घेतल्या आहेत.

* नेत्र विकार , सर्व साधारण वैद्यकीय तपासणी (जनरल चेकअप)
* दंत चिकित्सा / तपासणी , कान नाक घसा तपासणी ,त्वचा रोग तपासणी
* विद्यार्थी व शिक्षक, शिक्षकेतर कर्मचारी यांना आरोग्यदायी जीवनशैली अवलंबण्यासाठी आरोग्य शिक्षण देणे.

आयुष डॉक्टर हा त्या विभागातील सर्व आश्रम शाळेंना भेटी/सेवा देणारं असल्याने तो त्या विभागाच्या प्रकल्प अधिकाऱ्यास मदत व सल्ला देऊ शकतो. यामधे अपघात प्रतिबंध उपाययोजना परिसर स्वच्छता, शुध्द पाणी पुरवठा आदी बाबींचा समावेश असेल.

**१२. आयुष डॉक्टरांची जबाबदारी :-**

- महाराष्ट्र आपत्कालीन आश्रमशाळा सेवा कार्यक्रम अंमलबजावणीमागे आश्रम शाळेतील विद्यर्थ्याना गुणवत्तापूर्वक आरोग्य सेवा उपलब्ध व्हाव्यात अशी संकल्पना आहे .प्रकल्पांची अंमलबजावणी म्हणजे प्रशिक्षित आयुष्य डॉक्टरांच्यकडून बेसिक लाइफ सपोर्ट रूग्णवाहिकांच्या सहाय्याने त्यांच्या कार्यक्षेत्रातील क्लस्टर मधील सर्व आश्रमशाळेतील विद्यार्थ्यांना दिवसाचे २४ तास वैद्यकीय सेवा पुरवणे .
- क्लस्टर मधील आश्रमशाळांच्या सर्व विद्यार्थ्यांची नियमित आरोग्य तपासणी आयुष्य डॉक्टर करेल. डॉक्टर दररोज ५० ते ६० विद्यार्थ्यांची वैद्यकीय तपासणी करेल . प्रत्येक विद्यार्थ्यांची सखोल / पूर्ण वैधकीय तपासणी करण्यासाठी डॉक्टरांना ५ ते १० मिनिटांचा कालावधी लागणे अपेक्षित आहे . त्याचवेळी कॅल्स्टरमधील दुसऱ्या एखाद्या आश्रमशाळेमधून आपत्कालीन स्थितीबाबत बोलाविले तर तो त्याठिकाणी त्वरित जातील . पुरुष डॉक्टरांना मुलींच्या तपासणीचे वेळी शाळेतील प्रशिक्षित शिक्षिका किंवा ANM त्यांना मदत करतील .
- विद्यार्थ्याचे तपासणीनंतर डॉक्टर प्रत्येक विद्यर्थ्याचे आरोग्य विषयक कार्ड संगणकीय पद्धतीने तसेच प्रत्यक्ष हेल्थ कार्ड वर नोंद करतील . काही तांत्रिक अडचणी आल्यास डॉक्टर स्थानिक शासकीय अधिकाऱ्याची किंवा बी . व्ही .जी इंडिया लि. च्या वरिष्ठांशी चर्चा करतील . आदिवासी विभागाच्या मदतीने बी. व्ही .जी इंडिया लि. हे ऑनलाईन

| | | |
|---|---|---|
| | | पोर्टल तयार करेल जेणेकरून डॉक्टरांना विद्यार्थी तपासणी संदर्भात सर्व नोंदी संगणकीय प्रणाली मध्ये नोंद करता येतील .<br>➢ नियमित तपासणी नंतर ज्या विद्यार्थ्याना काही वैद्यकीय तपासणी किंवा विशेषज्ञ (specialist ) सल्ला घ्यावयाचा आहे त्यांची नाव नोंदणी डॉक्टर्स करतील . शाळेचे मुख्याध्यापक , सहायक प्रकल्प अधिकारी ( शिक्षण ) , विस्तार अधिकारी हे अशा विद्यार्थ्यांच्या पालकांना कळवतील व पुढील आरोग्य तपासणी व उपचार तयार केलेल्या नियमावलीनुसार करतील. |
| ९ | निधी वितरणाचे टप्पे | १) **भांडवली खर्च (Capital Expenditure)** – mobile Application व डॅशबोर्ड तयार करणे, बेस लोकेशनवरील सिकरूमधील आवश्यक उपकरण खरेदीसाठी रू.३५ लक्ष निधी कार्यारंभ आदेश दिल्यानंतर अदा करण्यात येईल.<br>२) **कार्यान्वयन खर्च )Operational Expenditure )** – मासिक बिले आवश्यक कागदपत्रांसह सादर केल्यानंतर मासिक बिलाच्या ७०% रक्कम अदा केली जाईल तसेच सर्व कागदपत्रे व बिल तपासणी झाल्यावर उर्वरित ३० % रक्कम अदा केली जाईल.<br>३) तसेच बिलामधून करण्यात येणारी वजावट/दंड हा उर्वरित ३० % मासिक बिलातून अदा करण्यात येईल. |
| १० | प्रकल्प राबविण्याच अटी व शर्ती | आदिवासी विकास विभाग व भारत विकास ग्रुप (बीव्हीजी) यांच्या मधील सामंजस्य करारामध्ये नमूद अटी व शर्ती नुसार हा प्रकल्प राबविणे भारत विकास ग्रुप (बीव्हीजी) ला बंधनकारक राहील. |
| ११ | प्रकल्पाचा कालावधी | प्रकल्प पूर्णपणे कार्यान्वित झाल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे<br>दि.०२.१०.२०१८ ते दि.३०.०९.२०२१ |
| १२ | प्रकल्पाचे संनियंत्रण व मुल्यमापन पर्यवेक्षण | सदर योजनेचे प्रकल्प कार्यालय,अपर आयुक्तालय, व मंत्रालय अशा ३ स्तरांवर संनियंत्रण करण्यात येईल.<br>अ (**प्रकल्प कार्यालय स्तर समिती** – |

| क्र | पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प | अध्यक्ष |

| | | |
|---|---|---|
| २ | संबंधित कार्यक्षेत्रातील अधिष्ठाता,शासकीय वैद्यकीय महाविद्यालय अथवा त्यांनी नियुक्त केलेला प्रतिनिधी | सदस्य |
| ३ | संबंधित कार्यक्षेत्रातील सिव्हील सर्जन अथवा त्यांनी नियुक्त केलेला प्रतिनिधी . | सदस्य |
| ४ | जिल्हा वैद्यकीय अधिकारी,जिल्हा परिषद | सदस्य |
| ५ | सेवा पुरवठादार (भारत विकास ग्रुप लि.) चे दोन प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | संबंधित कार्यक्षेत्रातील आश्रमशाळांमधील दोन नियुक्त मुख्याध्यापक | सदस्य |
| ७ | कार्यक्षेत्रातील आश्रमशाळांमधील विद्यार्थ्यांचे दोन नियुक्त पालक | सदस्य |
| ८ | सहायक प्रकल्प अधिकारी (शिक्षण) ,आदिवासी विकास विभाग | सदस्य सचिव |

प्रकल्प कार्यालय समिती ही मासिक बैठकीमध्ये तपासणी केलेले विद्यार्थी,दवाखान्यात दाखल केलेले व गंभीर आजार असलेले विद्यार्थी,प्रकल्प राबविण्यात येणा-या अडचणी व तक्रार निवारण ही कामे करील. ही समिती "तक्रार निवारण कक्ष " म्हणून कार्य करेल.

**आ) अपर आयुक्तालय स्तर समिती -**

| अक्र. | पदनाम | समितीमधील पद |
|---|---|---|
| १ | संबंधित अपर आयुक्त,आदिवासी विकास | अध्यक्ष |
| २ | संबंधित कार्यक्षेत्रातील उपसंचालक,आरोग्य सेवा संचलनालय (रूग्णालये/प्राथमिक आरोग्य केंद्र) | सदस्य |
| ३ | महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजनेचा प्रतिनिधी | सदस्य |
| ४ | सेवा पुरवठादार (भारत विकास ग्रुप लि.) चे दोन प्रतिनिधी | सदस्य |
| ५ | संबंधित कार्यक्षेत्रातील प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प | सदस्य |
| ६ | दोन नामांकित वैद्यकीय विशेषज्ञ | सदस्य |
| ७ | सहायक आयुक्त,अपर आयुक्तालय, आदिवासी विकास | सदस्य-सचिव |

ही समिती ही त्रैमासिक बैठक आयोजित करून प्रकल्प पूर्ण क्षमतेने कार्यान्वित राहण्यासाठी येणा-या अडचणींचे निवारण व प्रकल्पाचे सनियंत्रण करेल.

इ) मंत्रालय स्तर समिती -

| | | |
|---|---|---|
| १ | प्रधान सचिव , आदिवासी विकास विभाग | अध्यक्ष |
| २ | संचालक,आरोग्य संचलनालय | सदस्य |
| ३ | प्रकल्प संचालक,राष्ट्रीय आरोग्य अभियान | सदस्य |
| ४ | मुख्य कार्यकारी अधिकारी, महात्मा ज्योतिबा फुले जन आरोग्य योजना | सदस्य |
| ५ | सेवा पुरवठादार (भारत विकास ग्रुप लि.) चे दोन प्रतिनिधी | सदस्य |
| ६ | दोन नामांकित वैद्यकीय विशेषज्ञ | सदस्य |
| ७ | अपर आयुक्त,आदिवासी विकास,ठाणे,नाशिक, अमरावती, नागपूर | सदस्य |
| ८ | आयुक्त,आदिवासी विकास,नाशिक | सदस्य-सचिव |

प्रकल्पाच्या कामकाजाचे सनियंत्रण व मुल्यमापनासाठी प्रधान सचिव (आदिवासी विकास) यांच्या अध्यक्षतेखालील समितीची वर्षातून दोन वेळा बैठक आयोजित केली जाईल.

---*------*-------*---------*---------*----------*